मोफत इंन्फल्यूएंझा लसीकरण मोहिमेसाठी
इंन्फल्यूएंझा लस खरेदी करण्यासाठी
पूरकपत्राव्दारे मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग,**
**शासन पूरकपत्र क्रमांक: प्रशामा-२०१९/प्र.क्र.१८७/आरोग्य-८,**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउंड,
कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० वा मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक: ०६ जानेवारी, २०२०.

**संदर्भ-** १) सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/ साथरोग/सन २०१९-२०/इन्फ्लूएंझा लस खरेदी/१३४२२-२५/कक्ष-५८/१९, दि.१.८.२०१९.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१८/प्र.क्र.२१०/आरोग्य-८, दिनांक १५/१०/२०१८.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत इन्फल्यूएंझा लसीकरण करण्यासाठी लस खरेदी करण्यास संदर्भाधीन शासन निर्णयाअन्वये रुपये २,७६,३१,८००/- इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती, त्यानुसार हाफकीन महामंडळ, मुंबई खरेदी कक्षाकडून निविदा प्रक्रिया राबविण्यात आली असता, प्रती लस किंमत रुपये २९१/- असा दर ठरविण्यात आल्याने १,२९,००० लस खरेदीसाठी रुपये ३,७५,३९,०००/- इतका खर्च येत असल्याने रुपये ९९,०७,२००/- इतकी रक्कम वाढीव आली. सदर रक्कम सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीतून लेखाशिर्ष "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- राज्य योजनांतर्गत योजना- प्रादेशिक असमतोल दूर करणे-(०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम- २१, पुरवठा व सामग्री, (२२१० ४२८६)" या लेखाशिर्षातून खर्च करण्यासाठी प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन पूरकपत्र-:**

महाराष्ट्र साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत इन्फल्यूएंझा लसीकरणाकरिता लस खरेदी करण्यासाठी वाढीव रक्कम रुपये ९९,०७,२००/- इतका खर्च भागविण्यासाठी "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- राज्य योजनांतर्गत योजना-प्रादेशिक असमतोल दूर करणे-(०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम-२१, पुरवठा व सामग्री, (२२१० ४२८६)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून शासन निर्णय दिनांक १५.१०.२०१८ मध्ये दिलेल्या अटींच्या अधिन राहून खर्च करण्यास शासन पूरकपत्राद्वारे परवानगी देण्यात येत आहे.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन पूरकपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०६१८१८१९६०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.01.08 15:27:35 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती (आरोग्य-८)